**कंत्राटी ग्रामसेवकांच्या मानधनात वाढ करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.८६/आस्था-७

बांधकाम भवन, मर्झबान पथ, २५,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक: १८ जुलै, २०२३

**वाचा**

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्रमांक. एपिटी-२००७/ प्र.क्र.२९८/ आस्था-८, दिनांक १८ ऑक्टोबर, २०११

२) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली कृषीसेवक,ग्रामसेवक, शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्यासंदर्भात झालेली बैठक दि.२२ सप्टेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

वाचा येथील क्र.१ नुसार ग्रामसेवकांच्या मानधनात वाढ करण्यात आली होती. त्यानंतर ग्रामसेवकांच्या मानधनात वाढ केलेली नाही. वाचा येथील क्र.२ नुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. २२ सप्टेंबर, २०२२ रोजी बैठक पार पडली. सदर बैठकीत झालेल्या चर्चेनुसार कंत्राटी ग्रामसेवकांच्या मानधनात प्रति माह रु. १६०००/- एवढे करण्यात यावे असे आदेश दिले असून प्रस्ताव मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत सादर करण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार कंत्राटी ग्रामसेवकांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर बाब विचारात घेवून खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे..

**शासन निर्णय:-**

मंत्रिमंडळाने दिनांक १३ जून, २०२३ रोजी घेतलेल्या निर्णयानुसार राज्यातील कंत्राटी ग्रामसेवकांच्या मानधनात वाढ करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. यापूर्वी वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये कंत्राटी ग्रामसेवकांना रु. ६०००/- (अक्षरी रु.सहा हजार फक्त) एवढे प्रति महिना मानधन देण्यात येत होते. सदर मानधनात वाढ करुन आता कंत्राटी ग्रामसेवकांना प्रति महिना रु. १६,०००/- (अक्षरी रु.सोळा हजार फक्त) एवढे मानधन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र ८८/व्यय-१५, दि. २२.०२.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१८१४०८३१५८२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Popat D. Deshmukh

Digitally signed by Popat D. Deshmukh
DN: cn=Popat D. Deshmukh, o=Rural Development Department, ou, email=popat.deshmukh@nic.in, c=IN
Date: 2023.07.18 17:03:55 +05'30'

(पो.द.देशमुख)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा.विरोधी पक्ष नेता वि.सभा/परिषद यांचे स्वीय सहाय्यक
५) मा. मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव
६) मा.मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
७) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
८) सर्व विभागीय आयुक्त
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
११) सर्व उपायुक्त (विकास/आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालये
१२) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१३) सर्व सह/उप सचिव, अवर सचिव, कार्यासन अधिकारी, ग्रामविकास विभाग
१४) अपर मुख्य सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक
१५) माहिती तंत्रज्ञान कक्ष (ग्रा.वि.वि), बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१६) आपले सरकार कक्ष (ग्रा.वि.वि), बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१७) निवडस्ती, कार्यासन आस्था -७